**महसूल व वन विभागातील, क्र.म-१ (आस्था व धोरण) या कार्यासनांच्या एम-७ या दालनाच्या नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -:आस्थाप-२०२३/५१७/प्र.क्र.१५९/म-१**
दालन क्र.म-७-अ, पोटमाळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई- ४०००३२
दिनांक-: ९ जून, २०२३.

संदर्भः- **मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. मुअ(मुं/ का-२/ १३१४/२०२३, दि.१७/३/२०२३.**

**प्रस्तावना:-**

महसूल व वन विभागातील, मुद्रांक व नोंदणी प्रभागाचे आस्थापना व धोरण विषयक कामकाज हाताळणाऱ्या कार्यासन क्र.म-१ (आस्था व धोरण) मधील कर्मचारी/अधिकारी यांना सुलभ व पुरेशी बैठक व्यवस्था, तसेच कार्यासनांतील कागदपत्रांचे योग्यरितीने जतन करणेकरीता पुरेशी जागा उपलब्ध करून देणेकरीता एम-७ या दालनाचे नुतनीकरण करण्याची बाब विचाराधीन होती. सदर नुतनीकरणाचे काम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात आले आहे. सदर नुतनीकरणाच्या कामाकरीता मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी रु.३१,१५,७६९/- (रु. एकतीस लक्ष पंधरा हजार सातशे एकोण सत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करून संदर्भाधीन दि.१७/३/२०२३ रोजीच्या पत्रान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यतेस्तव प्रस्ताव सादर केला आहे. सदर खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

महसूल व वन विभागातील, क्र.म-१ (आस्था व धोरण) कार्यासनांच्या एम-७ या दालनाचे नुतनीकरण करणेकरीता रु.३१,१५,७६९/-(रु. एकतीस लक्ष पंधरा हजार सातशे एकोण सत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास, मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी तांत्रिक सहमती दर्शविली आहे. सदर नुतनीकरणाचे काम पूर्ण झाले असल्याने सदर कामाकरीता नमूद अंदाजपत्रकीय रकमेस वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/विनियम (भाग-२), दि.१७/४/२०१५ मधील परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१, परिच्छेद क्र.१३४ मधील विहित अटींच्या अधीन राहून

रु.३१,१५,७६९/-(रु. एकतीस लक्ष पंधरा हजार सातशे एकोण सत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च, " मागणी क्र.सी-२, मुख्य लेखाशिर्ष-२०५२, सचिवालयीन सर्वसाधारण सेवा, (००) (०१) महसूल व वन विभाग (अनिवार्य), १३, कार्यालयीन खर्च (२०५२०२१२) " या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम (भाग-२), दि.२०/९/२०१९ च्या शासन निर्णयातील तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि.२५/९/२०१९ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६०९१६३१२५००१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=1085617af371f507cb8ee4d914eb645d92480247b61bd58b5c3074ba3a6a62d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2023.06.12 12:15:10 +05'30'

**(सत्यनारायण बजाज)**
**उप सचिव (मुद्रांक)**

**प्रत,**

१. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, १/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. अधिदाने व लेखा अधिकारी, मुंबई.
४. सह सचिव, रोख शाखा, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कक्ष अधिकारी, रोख शाखा, महसूल व वन विभाग, मंत्रालय यांना विनंती करण्यात येते की,
६. प्रस्तुत निर्णयानुसार सार्वजनिक बांधकाम विभागास निधी उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करावी.
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
८. निवडनस्ती (म-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.